॥ श्री शंकरो विजयते ॥

A · 112

श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य विद्याशंकरभारती स्वामीमहाराज [ वाडीकर-जेरे ]
संस्थान मठ संकेश्वर-करवीर यांच्या अनुज्ञेने

— मठाभिमानी व धर्मप्रेमी शिष्यवर्गाच्या कल्याणासाठी —

# श्रीमच्छंकराचार्योपासना

शके १९०२ ) तृतीयावृत्ति ( सन १९८०

Q2:417
15MO;1

— संग्राहक व प्रकाशक —
जनार्दन दत्तात्रय पाठक,
मठीय कार्यदर्शी.

1535

( मूल्य तीन रुपये.

CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

– मठाभिमानी व धर्मप्रेमी शिष्यवर्गाच्या कल्याणासाठी –

# श्रीमच्छंकराचार्योपासना

शके १९०२ ) तृतीयावृत्ति ( सन १९८०

–संग्राहक व प्रकाशक–
काशिनाथशास्त्री जोशी,
मठीय कार्यदर्शी.

मूल्य तीन रुपये.

CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

## श्रीमदाद्य शंकराचार्य मंदिर
## आणि
## भारतीभवनमठ संस्था, सातारा

# निवेदन

या संस्थेचा इतिहास, ध्येयधोरण व संस्थेने आतापर्यंत केलेलें कार्य, संस्थेची आर्थिक परिस्थिती व गरजा.

"श्रीमदाद्य शंकराचार्य मंदिर आणि भारतीभवन मठ सातारा" ही संस्था इसवी सन १९३९ सालीं स्थापन झालेली आहे. ही संस्था श्रीमज्जगद्गुरू श्रीशंकराचार्य महाराज–विद्याशंकरभारती – शिष्यस्वामी महाराज (वाडीकर जेरे स्वामी) यांनी दोन हेतू मनांत धरून स्थापन केलेली आहे. एक म्हणजे श्रीमदाद्यशंकराचार्य मूर्तीची स्थापना करून मंदिर धर्मपीठ म्हणून उभारावें. (२) वेद आणि पूर्वशास्त्रें यांचें जुन्या परंपरागत पद्धतीनें शिक्षण देणारी पाठशाळा चालू करणें व त्यापद्धतीनें शिक्षण घेऊन वेदधर्माचा प्रचार करणारे अध्यापक तयार करणें. अशा रीतीने हल्ली वेदधर्माची हळू हळू होत जाणारी धर्मग्लानी थांबविण्यासाठी वेद धर्माची योग्य ती माहिती व जाणीव समाजांत उत्पन्न व्हावी हा उद्देश संस्था स्थापन करण्याच्या मुळाशी आहे. पहिली गोष्ट म्हणजे



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

श्रीमदाद्य शंकराचार्य या देवतेची पूजा-अर्चा करून आपल्या परमेश्वराची कृपा व वर प्राप्त होणें व वेद धर्म प्रचाराचें व धर्मरक्षणाचें अवश्य तें सामर्थ्य मिळणें. तसेच दुसरा हेतु या मार्गानें योग्य शिक्षण मिळालेले व अधिकारी असे तळमळीचे आपल्या धर्माचे प्रचारप्रवर्तक प्रचारक तयार व्हावेत या उद्देशानें शिक्षण देणें.

या शिष्यस्वामी महाराजांचा वैदिक धर्माचा प्रचार व प्रसार करणारी प्रवचनें करण्यासाठीं प्रचार दौरा ( संचार ) चालू असतांना सन १९३९ मध्यें सातारा येथें मुक्काम झाला. या मुक्कामांत शिष्यस्वामी ( वाडीकर जेरे स्वामी ) यांनीं दिलेल्या विद्वत्ताप्रचुर, प्रभावी आणि श्रोत्यांच्या अंतःकरणाचा ठाव घेणाऱ्या प्रवचनांचा योग्य तो परिणाम सातारा नगरींतील धार्मिक प्रवृत्तीच्या सद्गृहस्थांच्या मनावर होऊन त्यांनी सातारा येथें श्रीशंकराचार्य मठाची स्थापना करण्याची श्रींना आग्रहपूर्वक विनंती केली. त्याच हेतूनें प्रेरित होऊन सातारा येथील एक सद्गृहस्थ श्री. दत्तात्रय सिताराम गडणीस यांनी सातारा येथील १७९ गुरुवार पेठ यातील आपली स्थावर स्वसंपादित मिळकत या कार्यासाठीं दान देऊं केली. या हेतूनें प्रेरित होऊन या गृहस्थांनी दिनांक ५-९-१९३९ या दिनीं शिष्य स्वामीमहाराजांना ( वाडीकर जेरे स्वामींना ) दान दिली, व रजिस्टर्ड दानपत्र लिहून दिले. या उत्स्फूर्त प्रतिसादानें उत्साह प्रेरित होऊन श्रींनी या जागेंत श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या मूर्तीची स्थापना करून मंदिर उभारण्याची सुरवात केली, व ही संस्था सुरूं करण्याचें ठरविलें. आणि एक वर्षाच्या अवधींत



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

हें मंदिर बांधणीचें काम पुरें झालें. या कामीं साताऱ्यांतील त्यावेळचे प्रसिद्ध पुढारी श्री. श्रीधर विष्णु तथा तात्यासाहेब जोशी यांनी मोठा परिश्रमपूर्वक भाग घेतलेला आहे. या धर्म-भावनेला धरून व परिश्रमपूर्वक उद्योगानें श्रीमदाद्य शंकरा-चार्यांची अत्यंत शोभादायक व मनास आकर्षक अशी शुभ्र संगमरवरी मूर्ती आचार्य जन्मदिनीं म्हणजे शके १८६२ च्या वैशाख शुद्ध ५ या शुभ दिनीं स्थापन करण्यांत आली. तो दिवस इसवी सनाप्रमाणें १२-५-१९४० हा होता. त्यावेळीं शंकराचार्य वेदशास्त्र पाठशाळा " या नावाची पाठशाळा सुरू केली. सातारा शहराच्या दक्षिण हद्दीला असलेला इतिहास प्रसिद्ध असा अजिक्यतारा किल्ला आहे, त्याच्या पायथ्याशीं हें श्रीशंकराचार्य मंदिर व इतर इमारती आहेत. अशा शिक्षण-संस्थेला अवश्यक असलेलें शांत आणि निवांत वातावरण सभोवतालीं आहे; व ही संस्था म्हणजे तपोवनासारखी शांत व रम्य आहे.

प्रथम ही शिक्षण संस्था "सोसायटी रजिस्ट्रेशन अॅक्ट XXI १९६०" या कायद्याखालीं दिनांक २७–६–४६ ला रजिस्टर झालेली आहे. 'कंपन्यांचे रजिस्ट्रार साहेब मुंबई" यांनीं या संस्थेला दिलेला नंबर १४७२ हा आहे नंतर कांहीं कालानें मुंबई राज्य सरकारनें (हल्लीचें महाराष्ट्र राज्य सरकारनें) "बाँबे पब्लिक ट्रस्ट अॅक्ट १९५० या नावाचा कायदा पास केला. पब्लिक ट्रस्ट आहेत त्यांचें नियमन करण्या-करितां हा कायदा पास केला; व ही संस्था या नवीन कायद्या खालीं नोंदली गेली. मे. असिस्टंट चॅरिटी कमिशनर साहेब



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

कोल्हापूर यांनी या संस्थेला दिलेला दिलेला नंबर "नॉर्थ सातारा P2" हा आहे. तेव्हांपासून ही संस्था या कायद्याच्या नियमनाखाली आहे.

आमचा असा प्रामाणिक विश्वास आहे कीं आपल्या देशाचा अपकर्ष, अवनती आणि विकट परिस्थिती हल्ली झालेली आहे. त्याचें कारण आपल्या सनातन वैदिक धर्मातील तत्त्वांकडे आपलें दुर्लक्ष झालें आहे हें आहे. आपला समाज आपल्या वैदिक धर्माच्या बाबतीत अगदी उदासीन आहे. या जगातील सर्व धर्मांच्या मानानें वैदिक धर्म हा सर्वांत जुना, पुरातन आहे. आणि सर्व समाजाच्या कल्याणाच्या दृष्टीनें आवश्यक असलेली जी पायाभूत व चिरस्थायी तत्त्वें या तत्त्वांच्या पायावर प्रस्थापित झालेला हा धर्म आहे. अनन्त कालापासून निरीक्षण व अनुभव यांवर आधारलेला हा धर्म आहे. हें निरीक्षण सूक्ष्म दृष्टीचें व निस्वार्थ बुद्धीनें केलेलें असें आहे. या वैदिक धर्मावर बौद्ध, मुस्लीम व पाश्चात्य लोकांनी केलेल्या स्वाऱ्या व आघात सहन करूनही कोणताही फरक न होता सर्वांना पुरून उरलेला आहे. सत्य वस्तुस्थितीच हे संशयातीत दृष्टीनें पुरेशी सिद्ध करणारी आहे, कीं समाजाच्या कल्याणाच्या करितां व सामाजिक चिरकालिक स्वास्थ्य याकडे लक्ष असणारा आणि जगताच्या शाश्वत व विशाल तत्त्वांवर आधारित झालेला असा हा एकमेव वैदिक धर्म आहे. या दृष्टीनें पाहतांना या जगांत उत्कर्ष व्हावा आणि नष्ट झालेली शांतता पुन्हा प्राप्त व्हावी अशी इच्छा, तळमळ जर आपल्या ठिकाणीं असेल तर याला उपाय म्हणजे



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

आपण या वैदिक धर्माचाच आधार घेतला पाहिजे. आपल्या धर्माची तत्वें मनात बिंबविण्यासाठी शुद्ध कल्पना जनमानसांत रुजविण्याचें काम योग्य रीतीनें शिक्षण मिळालेले आणि केवळ प्रचार करणारेच नव्हेत तर जसा प्रचार करतात तसें स्वत: आचरण करणारे प्रचारक आपल्याला पाहिजेत. या साठींच अशा पाठशाळांची आवश्यकता आहे. याबरोबरच श्रीशिष्यस्वामी महाराज व पंडित काशिनाथशास्त्री जोशी (या पाठशाळेचे प्रमुखाध्यापक) यांनीं आपल्या धार्मिक तत्त्वां-वर प्रवचनें करण्यासाठीं व धर्माबाबत खऱ्या योग्य कल्पनांचाच प्रसार करण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर दौरे काढले. संचार केले

या पाठशाळेच्या आरंभापासूनच विद्याभूषण पंडित श्री. काशिनाथ शास्त्री दत्तंभट जोशी यांच्या योग्य त्या नेतृत्वा-खाली ही पाठशाळा चालू ठेवलेली आहे. पंडित काशिनाथ शास्त्री जोशी हे विद्वान् शास्त्री असून प्रामुख्यानें न्याय व वेदान्त या शास्त्रांतील विशेष अधीत पंडित आहेत. हे कोल्हापूर जिल्ह्यांतील श्री क्षेत्र नृसिंहवाडी येथील सुप्रसिद्ध सन्माननीय अशा कोडणीकर वैदिक घराण्यातील आहेत. त्यांचे प्राथमिक आणि माध्यमिक शालेय शिक्षण नेहमीच्या पद्धतीनें झालें. परंतु सन १९२९ मध्यें मॅट्रिक झाल्यावर त्यांना आपल्या जुन्या पद्धतीच्या शास्त्रांचा अभ्यास करावा अशी मानसिक प्रेरणा झाली. आधुनिक विद्यापीठीय शिक्षण घेण्यापेक्षां जुन्या शास्त्रांचें अध्ययन करणेंच श्रेयस्कर आहे असें त्यांच्या मनानें घेतलें. या विचाराला अनुसरून ते पुण्याच्या आचार्य कुलांत



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

प्रविष्ट झाले व तेथें त्यांनी कै. विष्णु वामन बापटशास्त्री व कै. नारायणशास्त्री वाडीकर यांच्या हाताखालीं शास्त्र शिक्षण घेतलें आणि व्याकरण शास्त्रांतील दोन, वेदांत शास्त्रांतील दोन व उपनिषदांतील एक अशा अनेक परीक्षांत यशस्वी-रीतीने उत्तीर्ण झाले सन १९३२ मध्यें ते न्यायशास्त्रांतील पुढील शिक्षण घेण्यासाठीं काशीला गेले. त्यांनी न्यायशास्त्रांतील पुढील शिक्षण सांगवेद विद्यालयांत सुप्रसिद्ध न्यायशास्त्र पंडित श्री. हरेरामशास्त्री शुक्ल यांच्या जवळ केलें. ते सन १९४० पर्यंत काशीला राहिले आणि तेथील आपली शास्त्र विद्या पुरी करून ते साताऱ्याला आले. त्यांची श्रेष्ठ विद्या-बुद्धी, नम्र स्वभाव आणि वैदिक धर्मावरील श्रद्धा भक्ति पाहून श्री शंकराचार्य शिष्यस्वामी महाराज यांनी सातारा येथील शंकराचार्य मठांतील श्रीशंकराचार्य वेदपाठशाळेवर त्यांची चालक म्हणून नियुक्ति केली. तेव्हापासून या पाठशाळेचे चालकत्व करून पाठशाळा शिक्षणाचे कार्य ते सतत चाळीस वर्षे करीत आहेत.

ही पाठशाळा गुरुकुल पद्धतीनें चालते. म्हणजे विद्यार्थी पाठशाळेच्या वास्तूतच राहतात आणि दिवसाचे चोवीस तास अध्यापकांच्या देखरेखीखाली व नजरेखाली विद्यार्थी असतात. विद्यार्थ्यांचे शिक्षण, राहणें आणि भोजन या सर्व गोष्टींबद्दल विद्यार्थ्यांना स्वतःचा कोणताही खर्च सोसावा लागत नाहीं. या सर्व सोयी पाठशाळेमार्फत विद्यार्थ्यांना मोफत दिल्या जातात. या पाठशाळेत वेदाध्ययन, न्याय, व्याकरण व वेदांत या विषयांचे



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

शिक्षण मोफत दिलें जाते. या प्रत्येक विषयाचे शिक्षणाचा काल बारा वर्षांचा आहे येथील विद्यार्थी पुणे वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या परीक्षांना बसतात. याशिवाय याज्ञिक कर्म म्हणजे पौरिहित्यांचें शिक्षण या पाठशाळेतून दिलें जातें. महाराष्ट्रांत या पद्धतीच्या पाठशाळा अगदी थोडयाच आहेत. ज्या इतर थोडया पाठशाळा आहेत. त्यातून या पाठशाळेप्रमाणें शिक्षण दिले जात नाहीं. अशी एक ठरलेली गोष्ट आहे की, जुन्या पद्धतीनें ज्यांचे अध्ययन झालें आहे असेच शास्त्री पूर्णपणे अधीतविद्य व खऱ्या अर्थानें विद्वान मानले जातात आतांपर्यंत या पाठशाळेतून दीडशे-पेक्षा जास्त विद्यार्थी शिक्षण घेऊन बाहेर पडले आहेत. त्यापैकी बरेचसे लोक शास्त्री, प्रचारक व शिक्षक म्हणून चांगले काम करीत आहेत. यांपैकीं (१) कै. यज्ञेश्वरशास्त्री जेरे २) तर्कतीर्थ नारायणशास्त्री सहाकारी हे वाई येथील विश्व-कोषाचे कार्यालयांत संशोधनकार्य करीत आहेत. ३) श्री. शंकर शास्त्री दामले. ४) श्री. सोमेश्वरशास्त्री जोशी ५) श्रीकृष्ण-शास्त्री जोशी ६) श्री. वासुदेवशास्त्री जोशी. अनुक्रमांक ४,५ व ६ चे शास्त्री हे या आमच्या पाठशाळेंत शिक्षक म्हणून काम करीत आहेत. सध्या या आमच्या पाठशाळेंत १७ विद्यार्थी आहेत. त्यांची विषयवार संख्या खालील प्रमाणें आहे. ऋग्वेद ३, न्याय व्याकरण वेदांत ८, याज्ञिकी पौरोहित्य ६. पाच अध्यापक आहेत. विद्यार्थ्यांचा नित्य दैनिक कार्यक्रम असा आहे:–



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

सकाळीं ५ वाजता उठणें.

,, ५ ते ६।। ईशस्तवन, प्रातर्विधी, स्नान, संध्यावंदन आणि अग्निकार्य.

,, ६।। ते ७।। अभ्यास

,, ७।। ते ११।। गुरुजींच्याकडून विषयपाठ घेणें.

,, ११।। ते २ भोजन विश्रांती व व्यक्तिगत स्वत:चे काम

दुपारी २ ते ५।। गुरुजींच्याकडून विषयपाठ घेणें

सायंकाळी ५।। ते ७ व्यायाम खेळ वगैरे.

,, ७ ते ८ सायं. संध्यावंदन, स्तोत्र पाठ देवताभिषेक इ.

रात्री ८ ते ८।। भोजन

,, ८।। ते ९।। अभ्यास.

,, ९।। झोपणें.

हे पाच शिक्षक पाठशाळेच्या इमारतींतच राहतात. व यामुळें त्यांचा या विद्यार्थ्यांशी कायमचा सहवास असतो. परिणामीं ते सतत कार्यरत असतात व ते इतर शाळा महाविद्यालयांतील शिक्षकाप्रमाणें पाठशाळेच्या आवाराबाहेर जाऊ शकत नाहींत. अशी बांधीव परिस्थिती असूनही आमची संस्था पुरेशा निधीच्या अभावामुळें त्यांना योग्य तें आर्थिक अनुदान देऊं शकत नाहीं. परंतु या धर्मकार्याच्या ठिकाणीं भक्तिभाव असल्यामुळेंच त्यानीं स्वत:च्या मतानें या धर्मकार्य सेवा कर्माला बांधून घेतले आहे. या त्यागपूर्वक भावनेने व स्वकर्तव्य बुद्धीनें चालविलेल्या सत्कार्यामुळे साहजिकच या शिक्षक व विद्यार्थी मंडळींच्या बाबत या शहरांतील लोकांच्या मनांत आदरभाव उत्पन्न झाला आहे व ते त्यांच्याशी आदरशील भावनेने वागत



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

आहेत. श्रीमदाद्यशंकराचार्य मंदिरात प्रतिदिनीं वेदांतावर प्रवचनें दिली जातात त्या प्रवचनांना शहरांतील प्रतिष्ठित धार्मिक वृद्धीचे सद्गृहस्थ नित्य उपस्थित असतात. वैशाख शु. ५ ला होणाऱ्या श्री. आचार्य जयंती उत्सव, व्यास पौर्णिमा ( आषाढ शु १५ ) आणि अश्विन महिन्यातील सरस्वती पूजन अशा विशेष उत्सव प्रसंगी बाहेरील विद्वान शास्त्री पंडितांना बोलावून त्यांच्या प्रवचनांचीही योजना केली जाते. अशा रीतीनें धर्म जागृती व वेदशास्त्र विद्या संवर्धन अशा दोन्ही हेतूंचे कार्य होण्याच्या हेतूची कार्यवाही व्हावी याबद्दल या संस्थेकडून अटोकाट प्रयत्न चालू आहेत

संस्थेच्या सुरुवातीपासूनच ही संस्था जनतेच्या सदिच्छे-वरच पूर्णपणें अवलंबून आहे. या संस्थेला सरकारी अनुदान नाहीं व कोणताही कायमनिधी नाहीं. यामुळे या संस्थेला स्थापनेपासून अतीशय कठीण व अडचणीच्या अर्थिक परि-स्थितीतून मार्ग काढावा लागत आहे. प्रत्येक बाबतींत जनतेच्या सहानुभूतीवरच अवलंबून रहावें लागलें आहे. श्री. गडणिसांनीं मोकळी जागा दिली, व जनतेच्या उदार देणगीतूनच श्रीमदाद्य-शंकराचार्य मंदिर बांधलें गेलें. पाठशाळेचें ग्रंथालय सातारा येथील सुप्रसिद्ध गजेंद्रगडकर घराण्यांतील विद्वान गृहस्थांनीं ५०० संस्कृत ग्रंथांची उदार देणगी दिल्यामुळें उभारलें गेलें. अशा रीतीनें संस्थेच्या चालकांना प्रारंभीचे दिवस मोठ्या खडतर परिस्थितींतून काढावे लागले आहेत. सन १९६० पर्यंत विद्यार्थ्यांच्या जेवण खाण्याची सोय संस्थेकडून होऊं शकली



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

नाहीं. त्यांना मधुकरी मागून उदर भरण करावें लागत होतें. तरी विद्यार्थ्यांना स्वच्छ ताजें व पोषक असें व योग्य वेळीं अन्न मिळावें याची जाणीव संस्थेला होत होती. परंतु द्रव्याभावी अशी सोय करणें अशक्य झालें होतें. याबाबत पंडित काशीनाथ शास्त्री जोशी हे आपल्या स्नेही मंडळींबरोबर विचारविनिमय करीत होते; आणि संस्थेच्या सुदैवानें त्यांच्या स्नेह्यांपैकी एक स्नेही श्री स. ग. जोशी, कुरुंदवाडचे वकील यांनी या कार्या-करिता दरमहा ५०० रु. ची देणगी देऊ केली आणि त्याप्रमाणें पाठशाळेमधून विद्यार्थ्यांची जेवणाची व्यवस्था होण्यासाठीं पाचसहा वर्षे आर्थिक मदत केली. परंतु या ५-६ वर्षांनंतर श्री. स. ग. जोशी यांची स्वतःची आर्थिक परिस्थिती खालावली गेली. यामुळें आर्थिक सहाय्य करण्याची त्यांची तळमळीची इच्छा असूनही त्यांना ही आर्थिक मदत पुढें चालू ठेवणें अशक्य होऊन बसलें. परिणामीं पाठशाळेला अडचणीची परिस्थिती निर्माण झाली. याकरिता पंडित काशिनाथशास्त्री जोशी यांना आपल्या वैदिक धर्माच्या साठीं प्रवचनें देण्यासाठी प्रचार दौरे काढावे लागले. अशा परिस्थितींत वरील स. ग. जोशी यांची कन्या सौभाग्यवती विजया कुलकर्णी रा. मुंबई आणि कै. ग. म. अमणापुरकर व त्यांच्या पत्नी यांनी आपले स्नेही सोबती मंडळीं मार्फत वर्गणी गोळा करण्याचे फार परिश्रम केले. श्रीमती अमणापूरकर यांनीं आपल्या कीर्तनांतून आमच्या पाठशाळेचा मोठा प्रचार केला आणि त्यांच्या प्रचारामुळें श्री. ना. य जोशी रा. मुंबई यांच्याकडून आमच्या या शिक्षण संस्थेला सन १९७४ मध्ये रुपये ९००१।–ची देणगी मिळाली.



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

अशारीतीने जेव्हा आमच्या पाठशाळेला पुन्हा अडचणीचे दिवस आले. त्यावेळीं या सौ. कुलकर्णी यांचा त्यांचे पिताजी श्री. स. ग. जोशी यांचे स्नेही मुंबईचे श्री. जी. के. कुलकर्णी यांच्याशी या पाठशाळेबाबत देणगी संबंधी बोलण्याचा सुयोग आला. हे श्री. जी. के. कुलकर्णी हे धार्मिक प्रवृत्तीचे फार सालस आणि सहकारी स्वभावाचे गृहस्थ आहेत. या पाठ-शाळेची फार बिकट परिस्थिती पाहून त्यांच्या मनांत अतीशय अस्वस्थता उत्पन्न झाली. त्यांनी श्री. विजय एस् सांड या उदार श्रीमान गृहस्थांशी या विषयी विचार विनिमय केला. श्री. सांड हे श्रीमान् बीर्ला शेठ यांचे प्रमुख कार्यवाह असे आहेत. यांनी चर्चा करून आमच्या या पाठशाळेची स्मरणिका प्रसिद्ध करण्याची योजना केली. याप्रमाणें सन १९७३ मध्ये एक व सन १९७५ एक मध्यें अशा दोन स्मरणिका प्रसिद्ध केल्या. श्री. सांड व श्री जी. के. कुलकर्णी यांच्या आवाहनानें मुंबई कलकत्ता वगैरे शहरांच्या ठिकाणच्या कारखानदारांनीं या दोन स्मरणिकांतून आपल्या जाहिराती दिल्या, कांही उद्योगपतींनी देणग्याही दिल्या. यांच्या प्रयत्नानें आम्हाला या दोन वर्षांच्या अवधींत ३,७५,०००:– रु. चा निधी गोळा करता आला. ही रक्कम स्वतंत्र कायमनिधी म्हणून कायम ठेवीत, युनिट ट्रस्ट वगैरे ठिकाणीं ठेवणेंत आली. यां कायम निधीला कोणत्याही खर्चाचे कामीं हात लावायचा नाही; फक्त त्याचें येणारें व्याज मात्र पाठशाळेच्या नित्य खर्चासाठी वापरांत यावयाचे असें ठरविण्यात आलें आहे. तथापि पाठशाळेचा दैनंदिन खर्च भागविण्यासाठी पुरेशी ही



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

व्याजाची रक्कम नाहीं. ही मोठी मदत मिळाली आणि मूल्यवान देणगी मिळाली याचें सर्व श्रेय श्री. जी. के. कुलकर्णी व व्ही. एस. सांड यांनाच आहे.

साताऱ्यातील प्रतिष्ठित पुढारी आणि ज्यांचा साताऱ्यांतील अनेक संस्थांशी अध्यक्षपदानें संबंध आहे असे सार्वजनिक कार्यकर्ते श्री. रा. ना. तथा बन्याबापू गोडबोले यांचा आम्हाला सतत पाठिंबा असून शक्य त्या सर्व मार्गांनी ते आम्हाला मदत करीत असतात

श्री. क्षेत्र काशी येथील अखिल भारतीय कीर्तीचे महान पंडित. श्री. राजेश्वर शास्त्री द्रवीड आणि श्री. हरेरामशास्त्री शुक्ल यांच्या सारखे प्रमुख शास्त्री व आधुनिक विद्वान गृहस्थ तसेच कांही उद्योगपती यांनी या आमच्या संस्थेला भेटी दिल्या आहेत. गेली ४० वर्षें आमच्या पाठशाळेनें जें कार्य केलें आहे. व करीत आहे त्यावद्दल प्रशंसोद्‌गार काढले आहेत. अशा रीतीने आमची ही पाठशाळा केवळ सातारा शहराच्याच नव्हे तर सबंध महाराष्ट्राच्या दृष्टीने अभिमानास्पद व उत्साहवर्धक अशी संस्था झालेली आहे.

आमच्या या संस्थेचें विश्वस्त मंडळ खालीलप्रमाणे आहे.

अध्यक्षः– श्री. १०८ श्रीमज्जगद्‌गुरु श्रीशंकराचार्य महाराज वाडीकर जेरेस्वामी ( आता समाधिस्थ )

उपाध्यक्षः– विद्याभूषण पंडित श्री. काशिनाथ शास्त्री जोशी

कार्यवाहः– श्री. शंकरशास्त्री दामले.



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

सभासद विश्वस्तः— १) श्री. सोमेश्वरशास्त्री जोशी.
२) श्री. श्रीकृष्णशास्त्री जोशी
३) श्री. रघुनाथ विष्णु कोल्हटकर

जरी आम्ही अडचणीच्या आडरानांतून बाहेर पडलेलों आहोंत; तरी आमची आर्थिक परिस्थिती अजूनही समाधानकारक स्वतः परिपूर्ण नाही. हल्ली या पाठशाळेत १७ विद्यार्थी व ५ अध्यापक आहेत. आणि कायमठेवींतून येणारें व्याज शाळेचा दरमहाचा खर्च जो चार हजार रुपयांपेक्षा जास्त आहे तो भागविण्या इतकें पुरेसें नाही. पाठशाळेंतील अध्यापकांना दिलें जाणारें मासिक अनुदान त्यांच्या विद्वत्तेच्या व शिक्षणाच्या जबाबदारीच्या मानानें पुरेसें नाही. त्याचप्रमाणें इमारतीच्या दुरुस्ती व नीट रक्षण याला येणारा खर्च या व्याजांतून भागविणें शक्यतेच्या बाहेरचें आहे. हल्लीची मठाची इमारतही विद्यार्थी, शिक्षक व ग्रंथालय यांना पुरेशी नाहीं. विद्यार्थ्यांचे पालक आणि इतर परस्थ पाहुणे येथें येतात व एक दोन दिवस मुक्काम करतात. त्यांच्या निवासा करितां एक अभ्यागत गृह बांधणेची आवश्यकता आहे. याकरितां हल्लीच्या इमारतीचा विस्तार करणें अत्यावश्यक झालें आहे. ग्रंथालयाकरितां नवीन ग्रंथ विकत घेणेची निकडीची जरूरी भासू लागली आहे. कारण गेलीं बरीच वर्षे अशी जरूरीचीं पुस्तकें विकत घेणें शक्य झाले नाहीं. नित्य लागणाऱ्या वस्तूंच्या किंमती महागाईमुळें वाढल्या आहेत. त्याकरितांही कांही पुरवठा करणें जरूरीचे आहे. कायम ठेवीवरील व्याजाचे दरांत



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

उतार झाल्यामुळें आमचें कायमठेवीवरील व्याजाचे उत्पन्न दहा टक्क्यांनी कमी झालें आहे. वरील सर्व बाबींचा मेळ घालण्यासाठीं अजूनही पांच लक्ष रुपयांचा निधि जमविणें अवश्यक झालें आहे. याकरितां धार्मिक मनोवृत्तीच्या व उदार अशा जनतेकडे आणि उद्योगपतींच्याकडे मागणी करणें या संस्था चालकांना भाग झाले आहे. असे उदार गृहस्थ आम्हाला एकांगी टाकणार नाहीतच, पण भरीव आर्थिक मदत, जशी यापूर्वी केली तशी, आताही करतील असा आम्हाला मोठा भरवसा आहे. या राष्ट्राच्या भरभराटीकरता व खऱ्या हिता-करितां जें धर्मकार्य आम्ही नेटानें चालवीत आहोत, ते कार्य प्राप्त होण्याचे कामी आम्हाला सर्वजण सर्व प्रकारें मदत करतील अशी खात्री आहे. तो दयाळु परमेश्वर सर्वांच्या अंतःकरणांत या धर्म रक्षण कार्याबावत चांगली प्रेरणा करो अशी त्या जगन्नियंत्या परमेश्वरचरणीं नम्र व कळकळीची प्रार्थना आहे.

विद्याभूषण पंडित श्री. काशिनाथशास्त्री जोशी.

चालू अध्यक्ष श्री मदाद्यशंकराचार्य मंदिर आणि
भारती भवनमठ व श्री. शंकराचार्य वेदशास्त्रपाठशाळा, सातारा.



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

# तृतीयावृत्तीसंबंधी प्रकाशकाचे अल्प निवेदन

श्री शंकरो विजयते

भाद्रपद पौर्णिमेच्या दिवशी सुधारून वाढविलेल्या तिसऱ्या णावृत्तीचे प्रकाशन करताना आम्हास आनंद होत आहे.

भक्तजन याही आवृत्तीचे स्वागत करतील असा अिश्वास आहे.

श्रीमच्छंकराचार्योपासना या पुस्तकाची द्वितीयावृत्ती संपून बरेच दिवस झाले होते. त्या पुस्तकाच्या पुनर्मुद्रणाचे कार्य अनेक अडचणींमुळे राहून गेले होते. अध्यात्मविद्याप्रदीप — दशोपनिषद्भाष्यचंद्रिका, वैदिक धर्मचंद्रिका व भारतीय राजनीति या पुस्तक छपाईस बराच खर्च झाल्याने या पुस्तकाचे छपाईस अवसर मिळत नव्हता.

महाराष्ट्रमित्र मुद्रणालयाचे चालक श्री. ना. ह. कोल्हटकर यांनी पुस्तक छपाईचे कार्य सत्वर केल्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे.

भाद्रपद शु।। १५ ।१९०२
गुरुवार २४।९।१९८०
सातारा

जनार्दन दत्तात्रय पाठक
मठीय कार्यदर्शी

श्री शंकरो विजयते

# प्रथमावृत्ति : प्रकाशकाचे अल्प निवेदन

श्रीमज्जगद्गुरु श्री शंकराचार्य श्री. सच्चिदानंद विद्याशंकर भारती (वाडीकर–जेरे) स्वामी महाराज मठ संकेश्वर–करवीर यांचे आचार्यपीठावर आरोहण आ. शु. ५ शके १८५४ सन १९३२ या वर्षी झाले. तेव्हापासून आतापर्यंत पीठाचे कर्तव्य या नात्याने धर्मोपदेशद्वारा धर्म जागृतीचे कार्य करणेसाठी सर्व भारतांत संचार चालू आहे. आचार्य पीठाकडून आत्तापर्यंत सर्व शिष्यवर्गांना वैदिक धर्माचे ज्ञान व्हावे व त्यांचेकडून धर्मानुष्ठान घडून त्यांना विविध सुखाचा लाभ व्हावा यासाठी अनेक पुस्तके प्रसिद्ध करण्यात आली. "श्रींचे चरित्र"

CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

या पुस्तकात श्रींच्या पूर्वाश्रमांतील त्यांचे जीवन-चरित्र व पीठाधिष्ठित झाल्यानंतर त्यांनी केलेले धर्मप्रचाराचे कार्य, तसेच 'भगवत्पूज्यपाद' श्रीमच्छंकराचार्य यांचे जीवन-चरित्र व त्यांची कामगिरी यावद्दल माहिती, वगैरे मठीय वृत्त दिले, दुसरे 'प्रवृत्ति धर्म' या पुस्तकांत वैदिक धर्मासंबंधी विशेष विचार केला आहे, तिसऱ्या 'अध्यात्मविद्या सिद्धांतसार' (निवृत्ति धर्म) या ग्रंथांत 'अध्यात्म विद्येचे सांगोपांग विवरण केले आहे.' 'चवथे' स्त्री धर्म' या प्रबंधात वैदिक धर्मात सर्व स्त्रियांच्यासाठी जी कर्तव्ये सांगितली आहेत. त्यांचे विवरण केले आहे. हे जे नवीन लहानसे पुस्तक प्रसिद्ध केले आहे, याचे नाव "श्रीमच्छंकराचार्योपासना" असे आहे. मठाभिमानी व धर्मप्रेमी सर्व शिष्यवर्गानी यथाधिकार श्री आचार्यचरणाची दररोज नियमाने उपासना करावी व त्या सर्व शिष्यवर्गाचा सर्व प्रकारे उत्कर्ष व्हावा या उद्देशाने श्रींच्या आज्ञेवरून सर्व शिष्यांच्या कल्याणाकरता हे पुस्तक प्रसिद्ध करण्याचे अहोभाग्य श्रींच्या कृपेनेच मला लाभले याबद्दल मला धन्यता वाटते यावज्जीवं त्रयः सेव्यः वेदान्तोगुरुरीश्वरः। आदौ ज्ञानाप्तयःपश्चात् कृतघ्नत्व निवृत्तये ॥ या श्लोकांत सांगितल्याप्रमाणे शास्त्र गुरु व ईश्वर यांची यावज्जीव सेवा मठ सांप्रदायाम अनुरूप कोणत्या पद्धतीने करावी ही माहिती सर्वांना व्हावी यासाठी या पुस्तकाचे प्रकाशन केले आहे. तरी या पुस्तकाचा मठाच्या सर्व शिष्यवर्गाने अवश्य स्वीकार करावा व आपले श्रेय संपादन करावे अशी मी शिष्यवर्गांना विनंती करून माझे अल्पसे निवेदन पुरे करतो. आचार्यपीठाकडून लवकरच एक सद्दावे पुस्तक "वैदिकधर्म व भारतीय राजनीति (अर्थशास्त्र)" या नावाचे प्रसिद्ध करण्यात येणार आहे.

श्रीक्षेत्र वाई येथील यशवंत प्रेसचे मालक श्री. गोपाळराव सोहनी यांनी या पुस्तकाचे छपाईचे काम सुंदर केले याबद्दल मी त्यांचे आभार मानतो.

मती फाल्गुन शु॥ ११
श्रीशंकराचार्य मठ – सातारा

जनार्दन दत्तात्रय पाठक
मठीय कार्यदर्शी

CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

# संकेश्वर-करवीरपीठाधिष्ठित श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य महाराज यांची बिरुदावलि

स्वस्ति श्रीमत्समस्तसुरवृन्दपूजितपादारविन्द शिवप्रतिबिम्बवर्यं
श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यं पदवाक्यप्रमाणपारावारपारीण
यमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्याष्टाङ्ग-
योगानुष्ठाननिष्ठ तपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरम्परा-
प्राप्तषड्दर्शनसंस्थापनाचार्यव्याख्यानसिंहासना-
धीश्वर सकलनिगमागमसारहृदयसाङ्ख्यत्रय-
प्रतिपादक सकलनास्तिकमतोच्छेदपूर्वक-
सकलधर्मसंस्थापनैकधुरीणवैदिकमार्गप्रवर्तक
सर्वतन्त्रस्वतन्त्रश्रीमहाराजधानीऋष्यशृङ्ग-
पुरवराधीश श्रीमद्राजाधिराजगुरुमण्डलाचार्य
श्रीमच्छङ्कराचार्यान्वयसञ्जाताभिनवपञ्चगङ्गा
तीरवासकमलानिकेतनकरवीरसिंहासनाधीश्वर श्री-
सच्चिदानन्दश्रीविद्यानृसिंहभारतीकरकमलकञ्जिल्कोद्भू
श्रीमदभिनवश्रीसच्चिदानन्दश्रीविद्याशङ्करभारतीस्वामि-
कृतानि श्रीभास्करपरिवारच्छात्राणामनुदिनमेधमानभ-
व्यजनकानि श्रीमच्छङ्कराराधनावसरीयनारायणस्मरणानि ॥

.........

CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

अनुक्रमणिका : पृष्ठ



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri



सातारा येथील जगद्गुरु श्रीशंकराचार्य मठांतील
**आद्य श्रीशंकराचार्य मूर्ती**

CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri



श्री १०८ श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य स्वामी महाराज

**वाडीकर-जेरे**

समाधी : दिनांक ६-३-१९८०.

CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri



काशीनाथशास्त्री जोशी,

वे. शा. सं. पं. विद्याभूषण न्यायरत्न

मुख्याध्यापक वेदपाठशाळा, सातारा

CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीशंकरो विजयते ॥



सजयति सिंदुरवदनो देवो यत्पादपंकजस्मरणम् ।
वासरमणिरिव तमसां राशीन्नाययति विघ्नानाम् ॥ १ ॥

नमस्ते शारदे देवि काश्मीरपुरवासिनि ।
त्वामहम् प्रार्थये नित्यम् विद्यादानं च देहि मे ॥ २ ॥

नारायणं पद्मभवं वशिष्ठं शक्तिच तत्पुत्रपराशरं च ।
व्यासं शुकं गौडपदं महांतं गोविंदयोगींद्रमथास्य शिष्यम् ॥
श्रीशंकराचार्यमथास्यपद्मपादंच हस्तामलकंच शिष्यम् ।
तं तोटकं वार्तिककारमन्यान् अस्मद्गुरून्,
संततमानतोऽस्मि ॥ ३ ॥

भस्मोद्धूलितसर्वांगं काञ्चनाभं यतीश्वरम् ॥
दण्डं च ज्ञानमुद्रां च बाहुभ्यां दधतं क्रमात् ॥ ४ ॥

षण्मतस्थापकं लोके कलौ शंकरदेशिकम् ।
ध्यायेऽहं भगवत्पामद्वैतज्ञानदायकम् ॥ ५ ॥

शास्त्रं शारीरमीमांसा देवस्तु परमेश्वरः ।
आचार्याः शंकराचार्याः संतु मे जन्मजन्मनि ॥ ६ ॥



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

# २ ॥ श्रीशिवमानसपूजा ॥

रत्नैः कल्पितमासनं हिमजलैः स्नानं च दिव्यांबरम् ।
नानारत्नविभूषितं मृगमदामोदांकितं चंदनम् ॥
जातीचम्पकबिल्वपत्रसहितं पुष्पं च धूपं तथा ।
दीपं देव दयानिधे पशुपते हृत्कल्पितं गृह्यताम् ॥ १ ॥

सौवर्णे मणिखण्डरत्नरचिते पात्रे घृतं पायसं ।
भक्ष्यं पंचविधं पयोदधियुतं रंभाफलं पानकम् ।
शाकानामयुतं जलं रुचिकरं कर्पूरखंडोज्ज्वलम् ।
तांबूलं मनसा मया विरचितं भक्त्या प्रभो स्वीकुरु ॥ २ ॥

छत्रं चामरयोर्युगं व्यजनकं चादर्शकं निर्मलं ।
वीणाभेरिमृदंगकाहलकलागीतं च नृत्यं तथा ॥
साष्टांगं प्रणतिः स्तुतिर्बहुविधा ह्येतत्समस्तं मया ।
संकल्पेन समर्पितं तव विभो पूजां गृहाण प्रभो ॥ ३ ॥

आत्मा त्वं गिरिजा मतिः सहचराः प्राणाः शरीरं गृहम् ।
पूजा ते विषयोपभोगरचना निद्रा समाधिस्थितिः ॥
संचारः पदयोः प्रदक्षिणविधिः स्तोत्राणि सर्वा गिरो ।
यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम् ॥ ४ ॥

करचरणकृतं वाक्कायजं कर्मजं वा ।
श्रवणनयनजं वा मानसं वापराधम् ॥
विहितमविहितं वा सर्वमेतत्क्षमस्व ।
जय जय करुणाब्धे श्रीमहादेवशंभो ॥ ५ ॥



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

# ३ विष्णुस्तोत्रम्



अविनयमपनय विष्णो दमय मनः शमय विषयमृगतृष्णाम्
भूतदयां विस्तारय तारय संसारसागरतः ॥ १ ॥

दिव्यधुनीमकरन्दे परिमलपरिभोगसच्चिदानन्दे ।
श्रीपतिपदारविन्दे भवभयखेदच्छिदे वंदे ॥ २ ॥

सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् ।
सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगाः ॥ ३ ॥

उद्धृतनग नगभिदनुज दनुजकुलामित्र मित्रशशिदृष्टे ॥
दृष्टे भवति प्रभवति न भवति किं भवतिरस्कारः ॥ ४ ॥

मत्स्यादिभिरवतारैरवतारवताऽवता सदा वसुधाम् ।
परमेश्वर परिपाल्यो भवता भवतापभीतोऽहम् ॥ ५ ॥

दामोदर गुणमंदर सुंदरवदनारविंद गोविंद ।
भवजलधिमथनमन्दर परमं दरमपनय त्वं मे ॥ ६ ॥

नारायण करुणामय शरणं करवाणि तावकौ चरणौ ।
इति षट्पदी मदीये वदनसरोजे सदा वसतु ॥ ७ ॥



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

# ४ देवीस्तोत्रम्



## देव्यपराधक्षमापनस्तोत्रम्

न मंत्रं नो यंत्रं तदपि च न जाने स्तुतिमहो
न चह्वानं ध्यानं तदपि च न जाने स्तुतिकथाः ।
न जाने मुद्रास्ते तदपि च न जाने विलपनं ॥
परं जाने मातस्त्वदनुसरणं क्लेशहरणम् ॥१॥

विधेरज्ञानेन द्रविणविरहेणालसतया ॥
विधेयाशक्यत्वात्तव चरणयोर्याच्युतिरभूत् ।
तदेतत्क्षंतव्यं जननि सकलोद्धारिणि शिवे ॥
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ २ ॥

पृथिव्यां पुत्रास्ते जननि बहवः संति सरलाः ॥
परं तेषां मध्ये विरलतरलोऽहं तव सुतः ॥
मदीयोऽयं त्यागः समुचितमिदं नो तव शिवे ।
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ ३ ॥

जगन्मातर्मातस्तव चरणसेवा न रचिता ।
न वा दत्तं देवि द्रविणमपि भूयस्तव मया ॥
तथापि त्वं स्नेहं मयि निरुपमं यत्प्रकुरुषे
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ ४ ॥

परित्यक्त्वा देवान्विविधविधसेवाकुलतया ॥
मया पंचाशीतेरधिकमपनीते तु वयसि ।
इदानीं चेन्मातस्तव यदि कृपा नापि भविता ।
निरालंबो लंबोदरजननि कं यामि शरणम् ॥ ५ ॥



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

श्वपाको जल्पाको भवति मधुपाकोपगिरा ।
निरातंको रंको विहरति चिरं कौटिकनकैः ।
तवापर्णे कर्णे विशति मनुवर्णे फलमिदम् ।
जनः को जानीते जननि जपनीयं जपविधौ ॥ ६ ॥

चिताभस्मालेपो गरलमशनं दिक्पटधरो ।
जटाधारी कंठे भुजगपतिहारी पशुपतिः
कपाली भूतेशो भजति जगदीशैकपदवीम् ।
भवानि त्वत्पाणिग्रहणपरिपाटीफलमिदम् ॥ ७ ॥

न मोक्षस्याकांक्षा न च विभववांछापि च न मे ।
न विज्ञानापेक्षा शशिमुखि सुखेच्छापि न पुनः ।
अतस्त्वां संयाचे जननि जननं यातु मम वै ।
मृडानी रुद्राणी शिवशिव भवानीति जपतः ॥ ८ ॥

नाराधितासि विधिना विविधोपचारैः ।
किं रूक्षचिंतनपरैर्न कृतं वचोभिः ॥
श्यामे त्वमेव यदि किंचन मय्यनाथे ।
धत्से कृपामुचितमंब परं तवैव ॥ ९ ॥

आपत्सु मग्नः स्मरणं त्वदीयं ।
करोमि दुर्गे करुणार्णवेशि ॥
नैतच्छठत्वं मम भावयेथाः
क्षुधातृषार्ताः जननीं स्मरंति ॥ १० ॥

जगदंब विचित्रमत्र किं परिपूर्णा करुणाऽस्ति चेन्मयि ।
अपराधपरंपरावृतं नहि माता समुपेक्षते सुतम् ॥ ११ ॥

मत्समः पातकी नास्ति पापघ्नी त्वत्समा नहि ॥
एवं ज्ञात्वा महादेवि यथायोग्यं तथा कुरु ॥ १२ ॥

इति श्रीमच्छंकराचार्यविरचितं देव्यपराधक्षमापनस्तोत्रं संपूर्णम्।



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

# ॥ श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रम् ॥

विश्वं दर्पणदृश्यमाननगरीतुल्यं निजान्तर्गतम्
पश्यन्नात्मनि मायया बहिरिवोद्भूतं यथा निद्रया ।
यः साक्षीकुरुते प्रबोधसमये स्वात्मानमेवाद्वयम्
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ १ ॥

बीजस्यान्तरिवाङ्कुरो जगदिदंप्राङ्निर्विकल्पंपुनर्-
मायाकल्पित देशकालकलनावैचित्र्यचित्रीकृतम् ।
मायावीव विजृम्भयत्यपि महायोगीव यः स्वेच्छया
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ २ ॥

यस्यैव स्फुरणं सदात्मकमसत्कल्पार्थकं भासते
साक्षात्तत्त्वमसीति वेदवचसा यो बोधयत्याश्रितान् ।
यत्साक्षात्करणात् भवेन्न पुनरावृत्तिर्भवाम्भोनिधौ
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ३ ॥

नानाच्छिद्रघटोदरस्थितमहादीपप्रभाभास्वरं
ज्ञानं यस्य तु चक्षुरादिकरणद्वारा बहिः स्पंदते ।
जानामीति तमेव भान्तमनुभात्येतत्समस्तं जगत्
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ४ ॥

देहं प्राणमपीन्द्रियाण्यपि चलां बुद्धिं च शून्यं विदुः
स्त्रीबालान्धजडोपमास्त्वहमिति भ्रान्ता भृशं वादिनः ।
मायाशक्तिविलासकल्पितमहाव्यामोहसंहारिणे
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ५ ॥

राहुग्रस्तदिवाकरेन्दुसदृशो मायासमाच्छादनात्
सन्मात्रः करणोपसंहरणतो योऽभूत्सुषुप्तः पुमान् ।



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

प्रागस्वाप्समिति प्रबोधसमये यः प्रत्यभिज्ञायते
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ६ ॥

बाल्यादिष्वपि जाग्रदादिषु तथा सर्वास्ववस्थास्वपि
व्यावृत्तास्वनुवर्तमानमहमित्यन्तः स्फुरन्तं सदा ।
स्वात्मानं प्रकटीकरोति भजतां यो मुद्रया भद्रया ।
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ७ ॥

विश्वं पश्यति कार्यकारणतया स्वस्वामिसंबन्धतः
शिष्याचार्यतया तथैव पितृपुत्राद्यात्मना भेदतः ।
स्वप्ने जाग्रति वा य एष पुरुषो मायापरिभ्रामितः
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ८ ॥

भूरम्भांस्यनलोऽनिलोम्बरमहर्नाथो हिमांशुः पुमान्
इत्याभाति चराचरात्मकमिदं यस्यैव मूर्त्यष्टकम् ।
नान्यत् किंचन विद्यते विमृशतां यस्यात्परस्माद्विभोः
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ९ ॥

सर्वात्मत्वमिति स्फुटीकृतमिदं यस्मादमुष्मिस्तवे
तेनास्य श्रवणात्तथार्थमननाद्ध्यानाच्च संकीर्तनात् ।
सर्वात्मत्वमहाविभूतिसहितं स्यादीश्वरत्वं स्वतः
सिध्येतत्पुनरष्टधा परिणतं चैश्वर्यमव्याहतं ॥ १० ॥

वटविटपिसमीपे भूमिभागे निषण्णं
सकलमुनिजनानां ज्ञान-दातारमारात् ।
त्रिभुवनगुरुमीशं दक्षिणामूर्तिदेवं
जननमरणदुःखच्छेददक्षं नमामि ॥ ११ ॥

चित्रं वटतरोर्मूले वृद्धाः शिष्या गुरुर्युवा ।
गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तु छिन्नसंशयः॥ १२ ॥



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

ॐनमः प्रणवार्थाय शुद्धज्ञानैकमूर्तये ।
निर्मलाय प्रशान्ताय दक्षिणामूर्तये नमः ॥ १३ ॥
निधये सर्वविद्यानां भिषजे भवरोगिणाम् ।
गुरवे सर्वलोकानां दक्षिणामूर्तये नमः ॥ १४ ॥
मौनव्याख्याप्रकटितपरब्रह्मतत्त्वं युवानं
वर्षिष्ठान्ते वसदृषिगणैरावृतं ब्रह्मनिष्ठैः ।
आचार्येन्द्रं करकलितचिन्मुद्रमानन्दरूपम्
स्वात्मारामं मुदितवदनं दक्षिणामूर्तिमीडे ॥ १५ ॥

इतिश्रीमदाद्यशंकराचार्यविरचितं श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रं सम्पूर्णम् ।

॥ श्री शंकरो विजयते ॥

# अथ श्रीसंकष्टहरण स्तोत्रम्

श्रीपाद श्रीवल्लभ त्वं सदैव ।
श्रीदत्तास्मान्पाहि देवाधिदेव ॥
भावग्राह्य क्लेशहारिन्त्सुकीर्ते ।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ १ ॥
त्वं नो माता त्वं पिताऽऽप्तोऽधिपस्त्वं ।
त्राता योगक्षेमकृत्सद्गुरुस्त्वम् ॥
त्वं सर्वस्वं नः प्रभो विश्वमूर्ते ।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ २ ॥
पापं तापं व्याधिमाधिं च दैन्यं ।
भीतिं क्लेशं त्वं हराऽशु त्वदन्यम् ॥
त्रातारं नो वीक्ष्य ईशास्तजूर्ते
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ ३ ॥



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

नान्यस्त्राता नापि दाता न भर्ता ।
त्वत्तो देव त्वं शरण्योऽकहर्ता ॥
कुर्वात्रेयानुग्रहं पूर्णराते ।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ ४ ॥
धर्मे प्रीतिं सन्मतिं देवभक्तिं
सत्संगाप्तिं देहि भुक्तिं च मुक्तिम् ॥
भावासक्तिं चाखिलानन्दमूर्ते ।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ ५ ॥
श्लोकपंचकमेतद्यो लोकमंगलवर्धनम् ।
प्रपठेन्नियतो भक्त्या स श्रीदत्तप्रियो भवेत् ॥ ६ ॥
इति. प. प. वासुदेवा वि. घोरकष्टोद्धरण स्तोत्रम् संपूर्णम् ।

## ५ शिवाष्टोत्तरशत नामावली



ध्यायेन्नित्यं महेशं रजतगिरिनिभं चारुचंद्रावतंसम् ।
रत्नाकल्पोज्ज्वलांगं परशुमृगवराभीतिहस्तं प्रसन्नम् ॥
पद्मासीनं समंतात्स्तुतममरगणैर्व्याघ्रकृत्तिं वसानम् ।
विश्वाद्यं विश्ववंद्यं निखिलभयहरं सर्वलोकैकनाथम् ॥



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

॥ श्री शंकर ॥

॥ श्रीमन्महागणाधिपतये नमः

१ महाकैलासशिखरनिलयाय नमो नमः
२ हिमाचलेंद्रतनयावल्लभाय नमो नमः
३ वामभागकलत्रार्धशरीराय नमो नमः
४ विलसद्दिव्यकर्पूरगौराङ्गाय नमो नमः
५ कोटिकंदर्पसदृशलावण्याय नमो नमः
६ रत्नमौक्तिकवैडूर्यकिरीटाय नमो नमः
७ मंदाकिनीजलोपेतमूर्धजाय नमो नमः
८ चारुशीतांशुशकलशेखराय नमो नमः
९ त्रिपुंड्रविलसत्भालफलकाय नमो नमः
१० सोमपावकमार्तंडलोचनाय नमो नमः
११ वासुकीतक्षकलसत्कुंडाय नमो नमः
१२ चारुप्रसन्नसुस्मरेवदनाय नमो नमः
१३ समुद्रोद्भूतगरलकंधराय नमो नमः
१४ कुरङ्गविलसत्पाणिकमलाय नमो नमः
१५ परश्वधवलसद्दिव्यकराब्जाय नमो नमः
१६ वराभयप्रदकरयुगुलाय नमो नमः
१७ अनेकरत्नमाणिक्यसुहाराय नमो नमः
१८ मुक्तासुवर्णरुद्राक्षमालिकाय नमो नमः
१९ हिरण्यकिंकिणीयुक्तकंकणाय नमो नमः
२० मंदारमल्लिकादाभूषिताय नमो नमः
२१ मत्तमातंगसत्कृत्तिवसनाय नमो नमः



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

२२ नागेंद्रयज्ञोपवीतशोभनाय नमो नमः
२३ सौदामिनीसमच्छायसुवस्त्राय नमो नमः
२४ सिंजीरमणिमंजीरचरणाय नमो नमः
२५ चक्राब्जध्वजयुक्तांध्रिसरोजाय नमो नमः
२६ अपर्णाकुचकस्तूरीरंजिताय नमो नमः
२७ गुहमत्तेभवदनजनकाय नमो नमः
२८ बिडौजाविधिवैकुंठनमिताय नमो नमः
२९ कमलापार्वतींद्राणीसेविताय नमो नमः
३० महापंचाक्षरीमंत्रस्वरूपाय नमो नमः
३१ सहस्त्रकोटितपनसंकाशाय नमो नमः
३२ अनेककोटिशीतांशुप्रकाशाय नमो नमः
३३ कैलासतुल्यवृषभवाहनाय नमो नमः
३४ नंदीभृंमुखानेकसंस्तुताय नमो नमः
३५ निजपादांबुजासक्तसुलभाय नमो नमः
३६ प्रारब्धजन्ममरणमोचनाय नमो नमः
३७ संसारभयदुःखौघभेषजाय नमो नमः
३८ ब्रह्मादिकीटपर्यंतव्यापकाय नमो नमः
३९ चराचरस्थूलःसूक्ष्मकल्पकाय नमो नमः
४० सर्वंसहमहमहाचक्रस्पंदनाय नमो नमः
४१ सुधाकरजगच्चक्षूरथांगाय नमो नमः
४२ सामाथर्वर्ग्यंजुर्वेदतुरगाय नमो नमः
४३ सरसीरुहसंजातप्राप्तसारथये नमो नमः
४४ वैकुंठनाथज्वलनसायकाय नमो नमः
४५ चामीकरमहाशैलकार्मुकाय नमो नमः



CC-0. Mumukshu Bhawan Varanasi Collection. Digitized by eGangotri

